उप निबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ या संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस १०१३ /प्र.क्र.४२८/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १२ जून,२०१५

वाचा :-१) शासन निर्णय क्र.राजस-१०१२/प्र.क्र.१०८/(पुनर्बांधणी-५)/५-स,दि.५/७/२०१२
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/ कक्ष-१/ सहनि-पदो.प्र/१०१४/२०१३, दि.२४/१०/२०१३
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/ कक्ष-१/ सहनि-पदो.प्र/१९७/२०१५, दि.९/३/२०१५

**प्रस्तावना :-**

उपनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन) या संवर्गातील दि.१/१/२०१४ ची अंतिम सेवाज्येष्ठता सूची विचारात घेवून तसेच सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गात नियमित पदोन्नतीच्या कोटयात ३ रिक्तता पाहून, त्यानुसार सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गातील ज्येष्ठता प्राप्त अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नती स्थानांक देण्याची व त्या अनुषंगाने सदर संवर्गातील तदर्थ पदोन्नतीच्या कोटयात ३ पदांवर तदर्थ पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील उपनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन) या संवर्गातून सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गात अनुक्रमांक १ येथील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये तदर्थ पदोन्नती देण्यात आलेल्या खालील ३ सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गात नियमित पदोन्नतीच्या कोटयात स्थानांक देण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीने शिफारस केल्यानुसार ३ पदांच्या नियमीत निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाने सहमती दर्शविली आहे. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून नियमित पदोन्नतीच्या कोटयात खालील अधिकाऱ्यांना स्थानांक देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.एस.ए.पाटील | खुला | खुला | विशेष कार्य अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २ | श्री.एम.व्ही.आकरे | इ.मा.व. | खुला | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे. |
| ३ | श्री.एम.डी.भालेराव | अ.जा. | अ.जा. | प्रादेशिक सहसंचालक, (साखर), अहमदनगर. |

२. उपरोक्त सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या पदावरील अधिकाऱ्यांना त्यांच्या विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधीन राहून स्थानांक देण्यात येत आहे.

३. तसेच उपनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन) या संवर्गात विभागीय पदोन्नती समितीने श्री.एच.पी.कोतवाल, श्री.बी.व्ही.शिंदे व श्री.एस.एस.क्षिरसागर यांना सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या ३ अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नती देण्यासाठी शिफारस केली आहे. सामान्य प्रशासन विभागाने सदर ३ पदांच्या तदर्थ निवडसूचीस सहमती दर्शवून तदर्थ पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रहातील या अटीच्या अधीन राहून मान्यता दर्शविली आहे. तसेच ज्या अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी सुरु असेल त्यांना पदोन्नती देतांना सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक दि.२/४/१९७६ नुसार विभागाने जाणिवपूर्वक निर्णय शासनाच्या मान्यतेने घ्यावा, असे अभिप्राय नोंदविलेले आहेत. त्यानुसार श्री.एच.पी.कोतवाल यांच्याविरुध्द ॲन्टी करप्शन ब्युरोने मा.न्यायालयात दाखल केलेला खटला व विभागाने सुरु केलेली विभागीय चौकशी प्रलंबित असल्याने, त्यांचे प्रकरण बंद लखोटयात ठेवण्यास शासनाने मान्यता दर्शविली आहे.

त्यामुळे उर्वरित खालील २ अधिकाऱ्यांना सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ या संवर्गात रु.१५,६००-३९,१००/-, गेड पे रु.६६००/- या वेतनश्रेणीत तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, महसूली विभाग वाटप नियम, २०१५ च्या अधिसूचनेनुसार खालीलप्रमाणे महसूली विभाग व पदस्थापनेचे ठिकाण दर्शविण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | पदोन्नती चा प्रवर्ग | महसूली विभाग | रिक्त पदावर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.बी.व्ही.शिंदे | भ.ज.(क) | खुला | कोकण | सहनिबंधक (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई |
| २ | श्री.एस.एस.क्षीरसागर | अ.जा. | अ.जा. | पुणे | सहनिबंधक तथा प्रकल्प संचालक, कृषी व्यापार विषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक कार्यक्रम, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे |

४. सदर पदोन्नत्या या संपूर्णपणे तात्पुरत्या स्वरुपात असून मा. उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्र.८४५४/२००४ मधील टी.ए. नं. ०१/२०१४ व टी.ए. नं. २/२००४ या संदर्भात मा. प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २८/११/२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशाच्या अधिन व त्याअनुषंगाने आरक्षण विषयक प्रलंबित असलेल्या याचिकेच्या निर्णयाच्या अधिन व लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे. सदरची पदोन्नती संपूर्णपणे तदर्थ स्वरुपात असून संबंधित अधिकाऱ्यांचा सदर पदावर कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

५. उपरोक्त अधिकाऱ्यांची सहनिबंधक, सहकारी संस्था गट-अ पदावरील पदोन्नती त्यांच्या विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

६. पदोन्नत अधिकाऱ्यांपैकी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ मिळालेल्या अधिकाऱ्याव्यतिरिक्त अन्य अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चिती संबंधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील नियम (११)(१)(ए)खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करावी.

७. सदर अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी संबंधीत अधिकाऱ्याकडून त्यांना तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेल्या पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंधपत्र सहकार

आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेवून तद्नंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे व सदर अधिकारी विहीत मुदतीत पदस्थापनेच्या जागी रुजु होतील याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१२१७४५००६००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykumar Vishnu Dapake

Digitally signed by Vijaykumar Vishnu Dapake
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijaykumar Vishnu Dapake
Date: 2015.06.12 17:46:36 +05'30'

( वि. वि. दपके )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२ मा.राज्यमंत्री (सहकार/पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव (पणन) / अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) / प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक.

४. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे

७. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य., पुणे

८. संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.

९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.

१० सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण व प्रशासन).

११. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था/सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था.

१२. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१५. संबधित अधिकारी, व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१६. सामान्य प्रशासन विभाग (सा.प्र.वि./कार्यासन-१२/ १६-ब), मंत्रालय, मुंबई.

१७. निवड नस्ती (कार्यासन-५स).